**सन २०२३-२४ करीता आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (मॅग्नेट) प्रकल्पासाठी निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मॅग्नेट ०४२३/प्र.क्र.१४९/२१-स**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २७ मार्च, २०२४.

**वाचा:-**

१) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.कृपमं-०११८/प्र.क्र.१३/२१-स, दि.३०.०९.२०२०.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.योजना-१०२०/प्र.क्र.१८३/२१-स, दि.०९.१०.२०२०.
३) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं- २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.मॅग्नेट ०४२३/प्र.क्र.१४९/२१-स, दि.११.०५.२०२३.
५) शासन शुध्दीपत्रक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.मॅग्नेट ०४२३/प्र.क्र.१४९/२१-स, दि.१६.०५.२०२३.
६) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.मॅग्नेट ०४२३/प्र.क्र.१४९/२१-स, दि.०१.१२.२०२३.
७) प्रकल्प संचालक, मॅग्नेट प्रकल्प यांचे पत्र क्र.मॅग्नेट/निधी मागणी २०२३-२४/२२०/२०२४, दि.०९.०२.२०२४.
८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०४.०३.२०२४.

**प्रस्तावना:-**

आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क प्रकल्प (Maharashtra Agribusiness Network-MAGNET) ६ वर्षासाठी राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये राबविण्यास संदर्भ क्र.१ येथील दि.३०.०९.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. मॅग्नेट प्रकल्पासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता सुधारित अंदाजामध्ये राज्य हिश्याकरीता रु.४३५६.४२ लक्ष व बाह्य हिश्याकरीता रु.१५७३४.३५ लक्ष असा एकूण रु.२००९०.७७ लक्ष इतका निधी मंजूर झाला आहे. मॅग्नेट प्रकल्पाकरीता चालू आर्थिक वर्षात सुधारित अंदाजामध्ये मंजूर निधीपैकी उर्वरित राज्य हिश्याकरीता रु.६२७.५२ लक्ष व बाह्य हिश्याकरीता रु.३९२.४५ लक्ष असा एकूण रु.१०१९.९७ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

१. महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (MAGNET) प्रकल्पासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता राज्य हिश्याकरीता रु.६२७.५२ लक्ष (रुपये सहा कोटी सत्तावीस लक्ष बावन्न हजार फक्त) व बाह्य हिश्याकरीता रु.३९२.४५ लक्ष (रुपये तीन कोटी ब्यान्नव लक्ष पंचेचाळीस हजार फक्त) असा एकूण रु.१०१९.९७ लक्ष (रुपये दहा कोटी एकोणीस लक्ष सत्त्यान्नव हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. आशियाई विकास बँक सहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क प्रकल्प (मॅग्नेट) प्रकल्पासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पित निधी, वितरीत निधी व वितरीत करावयाच्या निधीचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

**(रुपये लाखात)**

| लेखाशिर्ष | राज्य/बाह्य हिस्सा | सुधारित अंदाजामध्ये मंजूर निधी | चालू वर्षी वितरीत केलेला निधी | आता वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| ४४३५ ००४८ | राज्य हिस्सा (३०%) | ४३५६.४२ | ३७२८.९० | ६२७.५२ |
| ४४३५ ००५७ | बाह्य हिस्सा (७०%) | १५७३४.३५ | १५३४१.९० | ३९२.४५ |
| **एकूण** | - | **२००९०.७७** | **१९०७०.८०** | **१०१९.९७** |

३. महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (MAGNET) प्रकल्पासाठी होणारा खर्च खाली नमूद केलेल्या दोन लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ करीता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा:-

| **राज्य हिस्सा-लेखाशिर्ष** | **बाह्य हिस्सा-लेखाशिर्ष** |
|---|---|
| मागणी क्र. व्ही -३<br>४४३५ - इतर कृषिविषयक कार्यक्रम यावरील भांडवली खर्च<br>(०१), पणन व गुणवत्ता नियंत्रण<br>(१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका<br>(००)<br>(००)(०१) आशियाई विकास बँक सहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क प्रकल्प (मॅग्नेट) (राज्य हिस्सा ३० टक्के) (कार्यक्रम)<br>५४-गुंतवणूका<br>(४४३५ ००४८) | मागणी क्र. व्ही -३<br>४४३५ - इतर कृषीविषयक कार्यक्रमांवरील भांडवली खर्च<br>(०१), पणन व गुणवत्ता नियंत्रण<br>(१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका<br>(००)<br>(००)(०२) आशियाई विकास बँक सहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क प्रकल्प (मॅग्नेट) (बाह्य हिस्सा ७० टक्के) (कार्यक्रम)<br>५४-गुंतवणूका<br>(४४३५ ००५७) |

४. उपरोक्त परिच्छेद क्र.२ येथील तक्त्यात नमूद केलेल्या निधीचे आहरण व वितरण करण्यासाठी श्री.सु.सं.धपाटे, सह सचिव (पणन) (V००१०), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,

मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्री.सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई  यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेला निधी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरीत करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी यांनी करावी.

५.	मॅग्नेट प्रकल्पाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी RTGS सुविधेद्वारे प्रकल्पाच्या बँक खात्यावर जमा करावयाचा असून, त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| | |
|---|---|
| बँकेचे नाव | बँक ऑफ इंडिया, स्वारगेट शाखा, पुणे-०९ |
| खात्याचे वर्णन | MAGNET SOCIETY PMU |
| खाते क्रमांक | **050820110000820** |
| IFSC CODE | **BKID0000508** |

६.	या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे, त्याच कारणासाठी विनियोग करण्याबाबत प्रकल्प संचालक, मॅग्नेट संस्था यांनी खात्री करावी आणि यासंदर्भातील अनुपालन अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तत्परतेने सादर करावे.

७.	प्रकल्प संचालक यांनी सदर प्रकल्पांतर्गत खर्ची पडणाऱ्या निधीची आशियाई विकास बँकेकडून सत्वर प्रतिपूर्ती मिळवावी व मिळालेल्या प्रतिपूर्तीबाबत शासनास वेळोवेळी अहवाल पाठवावा.

८.	वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार विहीत केलेल्या अटींची पूर्तता होत असल्याने, सदर परिपत्रकान्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

९.	सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१५९/का.१४३१, दि.२९.०२.२०२४ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२४०/२०२४/व्यय-२, दि.१५.०३.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२७१५११३८२२०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADHAVI SANDEEP SHINDE

Digitally signed by MADHAVI SANDEEP SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=020531e249e88fe74bf6db805f42944e7f29bc0ba6134c83c1f183b8cc27f2ff, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4CB1CBBD6A4EE442FDAA6C1B358BF61FEAF9AEFC16E8F39E9EE1D06B9E8A7A59, cn=MADHAVI SANDEEP SHINDE
Date: 2024.03.27 15:21:46 +05'30'

**( माधवी सं. शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव  (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई.

३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे.
४. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (MAGNET) प्रकल्प, पुणे.
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य -१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य -२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) नागपूर.
७. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (व्यय-२/अर्थसंकल्प-१३/ऋण व हमी कक्ष), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव/कक्ष अधिकारी (१७-स/रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती (२१-स)